**निरा लागवड, उत्पादन, प्रक्रिया व विक्री याबाबत सुधारीत धोरण.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: एनआरए-०७२१/प्र.क्र.१०९/राउशु-३.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ९ नोव्हेंबर, २०२१.

<u>वाचा</u> :- १) शासन निर्णय क्र. NEE-१८६७/G.७९४१-III, दि.१६.८.१९६९.
२) शासन निर्णय क्र. एमआयएस-०६१२/प्र.क्र.२११/राउशु-३, दि.६.९.२०१४.
३) शासन निर्णय क्र. एमआयएस-०६१२/प्र.क्र.२११/राउशु-३, दि.१६.५.२०१७.
४) शासन निर्णय क्र. एमआयएस-०६१२/प्र.क्र.२११/राउशु-३, दि.२१.१०.२०२०.
५) शासन निर्णय क्र. एमआयएस-१०२०/प्र.क्र.१३८/राउशु-३, दि.५.१.२०२१.
६) आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, मुंबई यांचे आदेश क्र.निरा-११२०१८/१०५०१/२३/अकरा, दि.२०.२.२०२०.

**<u>प्रस्तावना</u> :-**

शासनाच्या महाराष्ट्र निरा नियम, १९५१ अन्वये निरा देणारी झाडे छेदणे व त्यापासून गुळ अथवा अन्य पदार्थ तयार करणे की ज्यामध्ये मादक द्रव्य नाही, निरेची विक्री करणे इत्यादी बाबीसाठी आवश्यक असलेली अनुज्ञप्ती मंजूर करण्याची तरतूद करण्यात आलेली आहे. उपरोक्त वाचा क्र.१ येथील शासन निर्णय, दि.१६.८.१९६९ अन्वये महाराष्ट्र राज्य खादी ग्रामोद्योग मंडळाने शिफारस केलेल्या सहकारी संस्थांना निरा विक्रीची परवानगी दिली जाते. तसेच, उक्त नमूद शासन निर्णयामध्ये निरा विक्री व उत्पादनाचे ठिकाण यातील अंतर १० मैलापेक्षा जास्त असू नये अशी तरतूद आहे. उपरोक्त वाचा क्र.२, ३, ४ व ५ येथील अनुक्रमे शासन निर्णय दि.६.९.२०१४, दि.१६.५.२०१७, दि.२१.१०.२०२० व दि.५.१.२०२१ अन्वये काही संस्था व निरा उत्पादक शेतकऱ्यांना महाराष्ट्र दारुबंदी अधिनियम, १९४९ मधील कलम १३९ (एन) नुसार असलेल्या अधिकारान्वये प्रायोगिक तत्वावर त्यांनी उत्पादित केलेली निरा सीलबंद करुन त्याची विक्री संबंधित महसूल विभागाच्या कार्यक्षेत्रात विक्री करण्याच्या अटीच्या अधीन राहून परवानगी देण्यात आली असून वेळोवेळी मुदतवाढ देण्यात आली आहे. सदर प्रायोगिक तत्वावरील परवानगी यशस्वी झाल्यास कायमस्वरुपी परवानगी व नियमात बदल करण्याबाबत शासन स्तरावर यथावकाश निर्णय घेण्यात येईल, असेही सदर शासन निर्णयांमध्ये नमूद करण्यात आले होते. निरा लागवड व वितरण याबाबत समग्र शासन धोरण ठरविण्यासाठी आवश्यक प्रस्ताव शासनास सादर करण्याचे निर्देश आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क यांना देण्यात आले होते. तद्नुषंगाने, आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क यांच्या दि.२०.२.२०२० रोजीच्या आदेशान्वये, निरा उत्पादन व विक्रीचे सर्वकष धोरण ठरविण्यासाठी आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क यांचे अध्यक्षतेखाली समिती स्थापन करण्यात आली होती. सदर समितीने निरा देणाऱ्या झाडांची लागवड, निरा सीलबंद स्वरुपात विक्री करणे, शीतगृहात ठेवणे, निरा उत्पादन व विक्री यंत्रणा सक्षम करणे याबाबत विचारविनिमय करुन सविस्तर अहवाल शासनास सादर केलेला आहे. सदर

अहवालातील समितीच्या शिफारशींच्या अनुषंगाने प्रचलित कार्यपध्दती आणि नियमातील तरतूदीमध्ये करावयाचा बदल विचारात घेऊन, निरा लागवड, उत्पादन, प्रक्रिया व ग्राहकांना शुध्द स्वरुपात निरा उपलब्ध व्हावी या हेतूने सुधारीत धोरण जाहीर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

१. निरा देणाऱ्या झाडांची लागवड, उत्पादन, प्रक्रिया व विक्री या बाबीला स्थैर्य प्राप्त होण्याच्या दृष्टीने पुढीलप्रमाणे धोरण जाहीर करण्यात येत आहे.

१.१ उपरोक्त वाचा येथील अ.क्र. १ मधील शासन निर्णय दि.१६.८.१९६९ याद्वारे अधिक्रमित करण्यात येत आहे.

१.२ **निरा अनुज्ञप्ती मंजूरी व नुतनीकरण कार्यपध्दती :-**

निरा व्यवसायाला स्थैर्य प्राप्त होण्याच्या दृष्टीने नमुना एन-१, एन-२, एन-३ व एन-४ या अनुज्ञप्त्यांचे नुतनीकरण संबंधितांच्या मागणीनुसार ५ वर्षाच्या कालावधीपर्यंत करण्यात यावे. उक्त अनुज्ञप्त्या वैयक्तिकरित्या अथवा सहकारी संस्थांना मंजूर करण्यात याव्यात. तथापि, अशा अनुज्ञप्त्या मंजूर करताना संबंधित अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क यांनी निरा देणा-या झाडांची उपलब्धता विचारात घ्यावी.

१.३ निरापासून गूळ तयार करावयाचे ठिकाण व निरा देणारी झाडे यातील अंतर अर्धा मैलपेक्षा जास्त असणार नाही, ही अट रद्द करण्यात येत आहे.

१.४ निरा काढल्यापासून २४ तासाच्या आत त्याचा वापर करावा. तथापि, त्यावर प्रक्रिया करुन, सीलबंद करुन ती ४ डिग्री किंवा त्यापेक्षा कमी सेल्सीयस तापमानात ठेवून त्याची कालमर्यादा (shelf life) वाढवता येईल. त्यास वेगळ्या परवानगीची आवश्यकता राहणार नाही.

१.५ निरा उत्पादनानंतर किण्वन प्रक्रिया होऊन ताडीमध्ये परिवर्तन होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. तसे निरा विक्रीच्या ठिकाणी आढळून आल्यास अनुज्ञप्ती निलंबित अथवा रद्द करण्याची कारवाई करण्यात येईल.

१.६ निरा उत्पादनानंतर, सीलबंद करताना तसेच, सीलबंद स्वरुपात निरा विक्री करताना अन्न सुरक्षा आणि मानके अधिनियमातील तरतूदींचे पालन करणे बंधनकारक राहील. सीलबंद निरेची विक्री करताना वैधमापन शास्त्र (आवेष्टित वस्तू) नियम, २०११ मधील तरतूदींचे पालन करणे बंधनकारक राहील.

१.७ सीलबंद निरेची योग्य साठवणूक, वितरण/ वाहतूक व्यवस्था असावी. अशा सीलबंद निरेची वाहतूक आवश्यकतेप्रमाणे शीतकरण यंत्रणा असलेल्या वाहनातून करावी. सीलबंद स्वरुपात निरेची विक्री राज्यात कुठेही करता येईल. निरा उत्पादनाचे ठिकाण व विक्री केंद्र यामध्ये १० मैलापेक्षा जास्त अंतर नसावे, ही अट रद्द करण्यात येत आहे.

१.८ जेथे निरा विक्री करावयाची आहे त्या ठिकाणी निरा विक्रीकरिता नमुना एन-३ /एन-४ ही अनुज्ञप्ती संबंधित अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क यांचेकडून प्राप्त करुन घ्यावी.

१.९ निरा सीलबंद करणे व निरा विक्रीसाठी नमुना एन-३ / एन-४ अनुज्ञप्ती मिळण्याकरिता खादी व ग्रामोद्योग महामंडळाच्या शिफारशीची आवश्यकता राहणार नाही. तथापि, पामगुळ बनविणे व इतर पाम उत्पादने उद्योग (Palmgur Making and other Palm Products Industry), व्हिनेगार इ. करिता राज्य उत्पादन शुल्क विभागाची परवानगी घेताना खादी व ग्रामोद्योग महामंडळास पूर्वकल्पना देणे बंधनकारक राहील.

१.१० **निरेमध्ये होणारी भेसळ रोखण्यासाठी उपाययोजना :-**

निरेमधील भेसळ ही pH meter किंवा Refractometer या उपकरणाद्वारे मोजली जाते. शुध्द निरेचा Brix साधारणपणे १४-१६ असतो. जर निरेमध्ये पाणी अथवा साखर टाकून भेसळ केल्यास Brix कमी येतो. निरेतील भेसळ शास्त्रशुध्द पद्धतीने ओळखण्यासाठी किट (kit) उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क यांनी करावी.

१.११ **निरा विक्री किंमतीवरील नियंत्रण रद्द करणे :-**

निरा विक्रीच्या दरावर शासन अधिसुचना दि.१२.१०.१९९२ अन्वये असलेले नियंत्रण रद्द करण्यात येत आहे. त्याबाबत शासन अधिसुचना यथावकाश निर्गमित करण्यात येईल.

१.१२ **जिल्ह्याबाहेरुन निरा आणून विक्री करण्यास परवानगी देण्याबाबत :-**

ग्राहकांना शुध्द निरा उपलब्ध व्हावी म्हणून जिल्ह्याबाहेरुन निरा आणण्यास परवानगी देण्यात येत आहे. तथापि, उक्त निरेची विक्री अशी निरा भांड्यात गोळा केल्यापासून १० तासाच्या आत अथवा निरा देण्याऱ्या झाडांच्या बनापासून ४०० कि.मी. पेक्षा कमी अंतराच्या आत निरा विक्रीचे दुकान असावे. मात्र, सीलबंद स्वरुपात व शीतकरण सुविधा उपलब्ध असल्यास उक्त नमूद अंतराची व वेळेची अट शिथील राहील.

१.१३ **ई लायसन्सींग / ऑनलाईन अनुज्ञप्ती मंजूरी पध्दत :-**

लोकाभिमुख व पारदर्शी प्रशासनाच्या दृष्टीकोनातून तंत्रज्ञानाचा फायदा लोकांना होण्यासाठी नमूना एन-१, एन-२, एन-३ व एन-४ इ. अनुज्ञप्ती / परवाने मंजूरीसाठी संगणक प्रणाली विकसित करण्याची कार्यवाही आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क यांनी करावी. कोणत्याही परिस्थितीत अर्ज केल्यापासून एक महिन्याच्या कालमर्यादेत निरा उत्पादन, सीलबंद करणे, विक्री, निरापासून गुळ व अन्य पदार्थ बनविण्यासाठी लागणारे आवश्यक परवाने / अनुज्ञप्त्या संबंधित प्राधिकाऱ्यांनी मंजूर/ नामंजूर कराव्यात. अन्यथा, सदर परवाने / अनुज्ञप्त्या संबंधितास मंजूर केल्या आहेत, असे गृहीत (Deemed Approval) धरण्यात येईल.

१.१४ निरा संबंधित नमूना एन-१, एन-२, एन-३ व एन-४ इ. अनुज्ञप्ती / परवाने मंजूर करण्याचे जिल्हाधिकारी यांना असलेले अधिकार संबंधित जिल्ह्याचे अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क यांना प्रदान करण्यात येत आहेत. तथापि, अनुज्ञप्ती रद्द अथवा निलंबित अथवा दंडात्मक कारवाई करण्याचे अधिकार संबंधित जिल्हाधिकारी यांना असतील.

१.१५ **Geo Tagging व संगणक प्रणालीचा वापर :-**

निरा देण्याऱ्या झाडांचे Geo Tagging करण्याबाबतचा कालबध्द कार्यक्रम हाती घ्यावा. अशी झाडे छेदणे, निरेची वाहतूक, दुकानातून विक्री करणे इ. साठी संगणकीय प्रणाली आयुक्त,

राज्य उत्पादन शुल्क यांनी प्राथम्याने विकसित करावी. सदर संगणकीय प्रणालीमुळे निरा उत्पादन, वाहतूक, विक्री या साखळीवर तसेच भेसळयुक्त विक्रीवर नियंत्रण ठेवणे विभागास शक्य होईल. निरा झाडांचे Geo Tagging करुन विकसित केलेल्या संगणकीय प्रणालीचा अवलंब निरा वर्ष सन २०२३-२४ पासून करण्यात यावा.

१.१६ **निरेचे जतन** (Preservation) **व संवेष्टन** (Packing) :-

निरेच्या झाडापासून जो सॅप (SAP) काढण्यात येतो, त्याच्यावर सुर्यप्रकाशाची किरणे पडल्यानंतर किण्वन प्रक्रिया आपोआप सुरु होते व निरेचे रुपांतर ताडीमध्ये होते. त्यामुळे, निरेचा जतन कालावधी वाढविण्यासाठी निरेचे संवेष्टन (Packing) सीलबंद बाटल्यांमध्ये/ पाऊचमध्ये करुन त्याची वाहतूक व विक्री एका ठराविक तापमानात करण्यात यावी. निरा सीलबंद बाटल्यांमध्ये/ पाऊचमध्ये भरण्यासाठी संवेष्टन (Packing) करण्याची मशीन/ यंत्रणा साठवणूकीसह उभी करण्यास संबंधित अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क यांनी आवश्यक ती कागदपत्रे प्राप्त करुन परवानगी द्यावी.

**२.** उक्त बदलांच्या अनुषंगाने महाराष्ट्र निरा नियम, १९५१ मध्ये आवश्यक ते बदल करण्यासाठी अधिसुचना/ आदेश स्वतंत्रपणे प्रसिध्द करण्यात येत आहेत.

**३.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२१११०९१७००५०३०२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

YUVRAJ BAYAJI AJETRAO

Digitally signed by YUVRAJ BAYAJI AJETRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a34e563dd43e83b04db3eb31230d59c1af4b6e29ee6c1f13e338b0ccd51689af, pseudonym=E1E1D29BB9359A74AC2418FA3547E9C78ABC18E0, serialNumber=C01C962D08BD39997D4C4D6E7E19F8ACF340D1A5C4DD2B9A00977369607BBF82, cn=YUVRAJ BAYAJI AJETRAO
Date: 2021.11.09 17:04:56 +05'30'

**( यु. ब. अजेटराव )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा.उप मुख्यमंत्री यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा. राज्यमंत्री (राउशु) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. प्रधान सचिव (राउशु) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
५. खाजगी सचिव, विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/विधानपरिषद, विधानभवन, मुंबई,
६. सर्व सन्माननीय संसद, विधानसभा व विधानपरिषद सदस्य,
७. आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
८. अन्न सुरक्षा आयुक्त, अन्न व औषध प्रशासन, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
९. सर्व विभागीय आयुक्त,
१०. जिल्हाधिकारी (सर्व जिल्हे),
११. सर्व विभागीय उप आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क,
१२. अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क (सर्व जिल्हे),
१३. निवड नस्ती.